मौजे निमगाव कोऱ्हाळे हद्दीतील जाणारा रस्ता व गट नं.१९५ येथे हेलिपॅडचे डांबरीकरण व इतर अनुषंगिक कामे, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यांच्याकडून करुन घेण्यास व निधी त्यांच्याकडे वर्ग करण्यास मंजुरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
**शासन निर्णय क्र. सासंवि -१०१८/१६१९/प्र.क्र.१८५/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१८.

संदर्भ:- मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएसटी/बांधकाम/३४९५/२०१८,दि.१३.१०.२०१८

**प्रस्तावना:-**

श्री साईबाबा समाधीस दि.१८.१०.२०१८ रोजी शंभर वर्षे पूर्ण झाली आहेत. या निमित्त श्रीसाईबाबा संस्थानामार्फत २०१७-२०१८ या वर्षात समाधी शताब्दी वर्ष साजरे करण्यात आले आहे. या महोत्सवाचा समारोप समारंभ कार्यक्रम दि.१९.१०.२०१८ रोजी मा.पंतप्रधान, भारत सरकार यांच्या उपस्थितीत करण्यात आला. मौजे निमगाव-कोऱ्हाळे, ता.राहाता येथील संस्थान मालकीचे सर्व्हे नं.१९५ पै मधील हेलिपॅड तसेच वितरिका क्र.११ वरुन हेलिपॅडकडे जाणा-या रस्त्याचे डांबरीकरण खराब झालेले असल्याने सदर डांबरीकरण व इतर अनुषंगिक कामे यासाठी येणारी खर्चाचा सविस्तर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यांच्याकडून मागवून त्याप्रमाणे निधी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यांच्याकडे वर्ग करण्याचा निर्णय व्यवस्थापन समितीच्या दि. ०५.१०.२०१८ रोजीच्या सभेत घेण्यात आला. मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये चारी क्र. ११ वरुन हेलीपॅडकडे जाणाऱ्या रस्त्याच्या दुरुस्तीसाठी, हेलीपॅडचे डांबरीकरण व इतर अनुषंगिक कामे करण्यासाठी निधी सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यांच्याकडे वर्ग करण्यास मागितलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने त्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्याकडून साजरा करण्यात आलेल्या श्री साईबाबा समाधी शताब्दी वर्षानिमित्त या समारंभाच्या समारोप कार्यक्रमास मा. प्रधानमंत्री, भारत सरकार हे उपस्थित असल्यामुळे चारी क्र. ११ वरुन हेलीपॅडकडे जाणाऱ्या रस्त्याच्या दुरुस्तीसाठी, हेलीपॅडचे डांबरीकरण व इतर अनुषंगिक कामे सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यांचेकडून करुन

घेण्यासाठी खालील तपशिलाप्रमाणे रु. ७९,४५,८५१/- इतका निधी सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यांच्याकडे वर्ग करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित रक्कम |
|---|---|---|
| १ | श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे मालकीचे निमगाव कोऱ्हाळे येथील हेलिपॅडचे डांबरी नुतनीकरण करणे. ता.राहता, जि.अहमदनगर | रु.३७,३६,७८७/- |
| २ | श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे मालकीचे निमगाव कोऱ्हाळे येथील हेलिपॅड ते नगर-मनमाड रस्ता पोहच मार्गाचे डांबरी नुतनीकरण करणे. ता.राहता, जि.अहमदनगर | रु.४२,०९,०६४/- |
| | एकूण रक्कम रुपये | रु.७९,४५,८५१/- |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१२०११२०९२१४४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.12.01 12:16:22 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.

**प्रति:-** १) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्रीसाईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.
४) मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर, ता. राहता,जि. अहमदनगर
६) निवड नस्ती/का.१६.